**शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील दुसरी व तिसरी पाळीतील कंत्राटी शिल्पनिदेशकांच्या मानधनात वाढ करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय- ३३१७/प्र.क्र.२१०/व्यशि-३**
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०४ जुलै, २०२३.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१०/प्र.क्र.६४/व्यशि-३, दि.२३.०८.२०१०

**प्रस्तावना :**

राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी आणि उर्वरित औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी पाळी ऑगस्ट २०१० सत्रापासून सुरू करण्यासाठी दुसऱ्या व तिसऱ्या पाळीत १२३९ व्यवसाय तुकड्यांसाठी आवश्यक असलेल्या १२३९ शिल्पनिदेशक, ५७ गटनिदेशक, २०४ गणित व चित्रकला निदेशक अशा कंत्राटी एकूण १५०० शिक्षकीय पदांच्या निर्मितीस (दरमहा रू. १५०००/- या ठोक मासिक वेतनावर) व त्यासाठी लागणाऱ्या एकूण रू. २४८०.९६ लक्ष इतक्या खर्चास विविध अटीस अधिन राहून दि. २३/०८/२०१० च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. तथापि, सदर कंत्राटी निदेशक यांनी शासनाला मानधनवाढीबाबत वारंवार दिलेल्या निवेदनाच्या अनुषंगाने राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी साठी कंत्राटी तत्वावर घेण्यात आलेल्या शिल्पनिदेशकांचे मानधन वाढीबाबत मंत्रिमंडळाच्या दिनांक १६.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

१. सद्य:स्थितीत औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये कार्यरत २९७ निदेशकांचे मानधन दिनांक ०१ एप्रिल, २०२३ पासून रु. १५०००/- वरुन रु. २५०००/- दरमहा करण्यात यावे.
२. दर वर्षांनी कर्मचाऱ्यांच्या कार्याबाबत आढावा घेण्यात येवून सेवा पुढे सुरु ठेवण्याबाबत विभागाने योग्य कार्यवाही करावी.
३. शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील कार्यरत कंत्राटी शिल्पनिदेशक यांच्याकडून वेळोवेळी शासन सेवेत नियमित करणेबाबत मागणी करण्यात येते, त्याअनुषंगाने मा. मंत्री (कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता) विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करुन योग्य तो निर्णय घेण्यात यावा.

सदर मंत्रिमंडळाच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त प्रमाणे मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार -

१. कंत्राटी तत्त्वावरील कार्यरत असलेल्या निदेशकांचे मानधन ₹१५,०००/- वरुन ₹२५,०००/- दरमहा इतके करण्यात येत आहे. सदरची मानधनवाढ दिनांक ०१ एप्रिल, २०२३ पासून लागू करण्यात येत आहे.

२. दर वर्षांनी कर्मचाऱ्यांच्या कार्याबाबत आढावा घेण्यात येवून सेवा पुढे सुरु ठेवण्याबाबतची कार्यवाही संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत करण्यात यावी.

३. मंत्रिमंडळाच्या बैठकीतील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील कार्यरत कंत्राटी शिल्पनिदेशक यांच्याकडून वेळोवेळी शासन सेवेत नियमित करणेबाबत मागणी करण्यात येते, त्याअनुषंगाने मा. मंत्री (कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता) विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

सदर कर्मचाऱ्यांच्या मानधनावरील खर्च "लेखाशिर्ष प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (२२३०ए२०९) (कार्यक्रम) (१०) कंत्राटी सेवा" या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०७०४११५४२३७४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NAMDEO
KONDIBA
BHOSALE

Digitally signed by NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT,
2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8C6A286229ECC7982A08553F49D547EF64BE25C7F26FC96324ECE7CCCBFEB8C5, cn=NAMDEO KONDIBA BHOSALE
Date: 2023.07.04 11:56:00 +05'30'

**(डॉ. ना. कों. भोसले)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अमुस, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अमुस, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अमुस ,कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग **,** मंत्रालय**,**मुंबई
५. संचालक**,** व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय**,** महाराष्ट्र राज्य**,** मुंबई.

६. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,मुंबई/नाशिक/पुणे /औरंगाबाद/ अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)

०७. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत )

०८. निवड नस्ती. (व्यशि-३).